**महाराष्ट्र शासन**
रोजगार व स्वयंरोजगार विभाग
**शासन निर्णय** क्रमांक : रोस्वरो-२००७/प्र.क्र.४१/रोस्वरो-१
नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-१३ ऑगस्ट, २००९.

**वाचा** :१)-शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
क्र.धोरण-२०००/प्र.क्र. १५८/रोस्वरो-१, दि. ६ ऑक्टोबर, २०००.
२) शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
क्रमांक : रोस्वरो-२००७/प्र.क्र.४१/रोस्वरो-१ दिनांक २९ जून, २००७.
३) शासन पत्र, रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
क्रमांक : रोस्वरो-२००७/प्र.क्र.४१/रोस्वरो-१ दिनांक २९ ऑगस्ट, २००७
४) आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, यांचे पत्र
क्रमांकः रोस्वसं-८/ सेसो/रोमेळावे/५३६५ दिनांक ४ जून, २००९

**प्रस्तावना :**

शासनाच्या स्वयंरोजगाराच्या धोरणाची प्रभावी अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने सुशिक्षित बेरोजगारांना रोजगार/स्वयंरोजगार उपलब्ध करुन देण्यासाठी नियोक्ते, कारखानदार, व्यापारी व सुशिक्षित बेरोजगार यांचे एकत्रित रोजगार मेळावे राज्यातील १५ जिल्ह्यात आयोजित करण्यासाठी उपरोक्त दिनांक २९ जून, २००७ च्या शासन निर्णयान्वये आदेश देण्यात आले आहेत. तसचे सदर शासन निर्णयात प्रती मेळावा रु.३७,०००/- इतक्या मर्यादेपर्यंत खर्च करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. या मेळाव्यांना उद्योजक व बेरोजगारांकडून मिळालेला अत्यंत चांगला प्रतिसाद व त्यांची उपयुक्तता लक्षात घेऊन राज्यातील १५ जिल्ह्याशिवाय इतर जिल्ह्यातही रोजगार मेळावे आयोजित करण्यात यावे असे उपरोक्त दिनांक २९ ऑगस्ट, २००७ च्या पत्रान्वये कळविण्यात आले होते. रोजगार मेळावे राज्यातील सर्व जिल्ह्यात तसेच विभागीय स्तरावर नियमितपणे आयोजित करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.-

**शासन निर्णय :**

सन २००७-०८ या वर्षापासून मुंबई, ठाणे, कल्याण, पनवेल, पुणे, पिंपरी चिंचवड, सातारा, महाबळेश्वर, सोलापूर, कोल्हापूर, औरंगाबाद, नांदेड, लातूर, नागपूर व अमरावती इ. ठिकाणी नियमितपणे आयोजित करण्यात आलेले रोजगार मेळावे व त्यास मिळालेला प्रतिसाद व त्यांची उपयुक्तता लक्षात घेऊन आता राज्यात **सर्व जिल्ह्यात** तसेच **विभागीय स्तरावर** असे **रोजगार मेळावे** नियमितपणे आयोजित करण्यात यावे असा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. वर्षभरात प्रत्येक जिल्ह्यात किमान चार व विभागीय स्तरावर किमान एक मेळाव्यांचे आयोजन करावे. तथापि, संबंधित जिल्ह्यातील औद्योगिक वसाहतींची संख्या व उपलब्ध होणा-या रोजगाराच्या संधी विचारात घेऊन आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार हे सदर संख्येत फेरबदल करु शकतील.

३. रोजगार मेळावे आयोजित करण्यासाठी येणा-या खर्चाची एकूण मर्यादा दिनांक २९ जून, २००७ च्या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणेच राहील.

४. सदर मेळाव्यांवर होणारा खर्च हा मागणी क्र.झेडए-१,२२३० कामगार व सेवायोजन, ०२ सेवायोजन, ००४ संशोधन, सर्वेक्षण व सांख्यिकी, (०१) (०१) सेवायोजन रोजगार उपलब्धताविषयक माहिती व युवक रोजगारविषयक सेवा (२२३०११०७), ३४ शिष्यवृत्या व विद्यावेतने या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०८१३१३५६४७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(वि.रा.शिरसाट)
शासनाचे उप सचिव

प्रति,
मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव /सचिव,
वित्त विभाग (अर्थसंकल्प-२०/अर्थसंकल्प-३/ व्यय-५),
नियोजन विभाग (कार्यासन १४४३),
सर्व मंत्रालयीन विभाग,
आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
निवड नस्ती (रोस्वरो-१),
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा), मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा), नागपूर.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उपसंचालक, रोजगार व स्वयंरोजगार, विभागीय मुख्यालये,
सर्व सहाय्यक संचालक, जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी,
रोजगार व स्वयंरोजगार विभागातील सर्व कार्यासन अधिकारी,